

# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

## २२) श्रीगणाधिपस्तोत्रम्-१

सरागिलोकदुर्लभं विरागिलोकपूजितं!
सुरासुरैर्नमस्कृतं
जरादिमृत्युनाशकम् !!
गिरा गुरुं श्रिया हरिं
जयन्ति यत्पदार्चका !
नमामि तं गणाधिपं
कृपापय: पयोनिधिम् !!१!!

भगवान जगद्गुरु आदि शंकराचार्य स्वामी महाराजांनी भगवान श्रीगणेशांची एकूण चार स्तोत्रे रचली आहेत. या चवथ्या स्तोत्रात आचार्य श्री, भगवान श्रीगणेशांचे वर्णन करताना म्हणतात,

सरागिलोकदुर्लभ- राग शब्दाचा अर्थ आहे ज्ञानेंद्रियांच्या द्वारे कळणाऱ्या बाह्य गोष्टींबाबतची आसक्ती. अशा आसक्तीने युक्त ते सरागी. अशा सरागी लोकांना श्री गणराज प्रभू दुर्लभ असतात. कारण राग बाह्य गोष्टींचा असतो तर मोरया अंतरंगी आहे हा भाव. त्यामुळे त्यांना सरागिलोकदुर्लभ असे म्हणतात.

विरागिलोकपूजित- उलटपक्षी ज्यांच्या ठिकाणी वैराग्य आलेले असते ते साधक ज्यांची उपासना करतात त्यांना विरागिलोकपूजित असे म्हणतात.

सुरासुरैर्नमस्कृत - सुर म्हणजे देवता तर असुर म्हणजे दैत्य. या दोघांच्याही कडून ज्यांना वंदन केले जाते ते सुरासुरैर्नमस्कृत.

जरादिमृत्युनाशक- जरा म्हणजे म्हातारपण. सामान्य जीवनातील विविध दु:खांमधील हे सगळ्यात मोठे दु:ख. तर जगातील सगळ्यात मोठे दु:ख मृत्यू. या दोन्ही गोष्टींमधील दु:ख नष्ट करणारे ते जरादिमृत्युनाशक. या घटना तर घडणारच आहेत. पण त्याचे दु:ख वाटत नाही अशी मोरयाची कृपा.

गिरा गुरुं श्रिया हरिं
जयन्ति यत्पदार्चक- ही ओळ खूपच वैशिष्ट्यपूर्ण आहे. जे आपल्या उपासकांना गिरा म्हणजे वाणीच्या बाबतीत गुरु म्हणजे देवगुरु बृहस्पती तर श्री म्हणजे लक्ष्मी च्या बाबतीत श्री विष्णूंपेक्षा अधिक संपन्न करतात . अशा शब्दांत आचार्यश्रींनी मोरयाच्या कृपेचे महत्त्व वर्णिले आहे.

अशा कृपारूपी जलाचे महासागर असणाऱ्या श्रीगणेशाचे मी वंदन करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

२३) श्री गणाधिपस्तोत्र २

गिरींद्रजामुखाम्बुजप्रमोददानभास्करं !
करीन्द्रवक्त्रमानताघसङ्घवारणोद्यतम् !!
सरिसृपेशबद्धकुक्षिमाश्रयामि संततं !
शरीरकांतिनिर्जिताब्जबन्धुबालसंततिम् !!२!!

गिरींद्रजामुखाम्बुजप्रमोददानभास्कर- गिरी शब्दाचा अर्थ आहे पर्वत. त्या सर्व पर्वतांचा राजा तो गिरींद्र. अर्थात हिमालय. सगळ्यात मोठा पर्वत. सगळ्यात विशाल पर्वत. म्हणून पर्वतांचा राजा. त्या पर्वतराज हिमालयापासून जन्माला आली देवी पार्वती. त्यामुळे तिला म्हणतात गिरींद्रजा.

त्या देवी पार्वतीच्या मुखरूपी कमळाला, मुखांबुजाला आनंदित करणारे, त्या कमळाला फुलविणारे जणूकाही जे सूर्य त्यांना म्हणतात, गिरींद्रजामुखाम्बुजप्रमोददानभास्कर.

करीन्द्रवक्त्र- करी म्हणजे हत्ती. गजराजांचे मुख असणारे ते करीन्द्रवक्त्र.

आनताघसङ्घवारणोद्यत- आनत अर्थात पूर्णपणे शरण आलेल्यांचे. अघ शब्दाचा अर्थ आहे पाप, दोष. त्या सगळ्यांचा संघ म्हणजे समूह. या सगळ्यांच्या, वारणासाठी, विनाशासाठी जे सदैव तत्पर आहेत ते, आनताघसङ्घवारणोद्यत.

सरिसृपेशबद्धकुक्षी- सरिसृप अर्थात सरपटणारे जीव. त्यांचा ईश अर्थात सर्वोच्च. सगळ्या सरपटणाऱ्या जीवांमध्ये श्रेष्ठ आहे सर्प. त्या सगळ्या सर्पांचे राजे आहेत भगवान श्री शेष.त्यांना जे आपल्या कुक्षी म्हणजे कमरेला, करदोड्याच्या स्वरूपात बांधून ठेवतात ते सरिसृपेशबद्धकुक्षी.

शरीरकांतिनिर्जिताब्जबन्धुबालसंतती- येथे भगवान गणेशांचा शरीर कांतीचे सौंदर्य वर्णन करतांना आचार्य श्री म्हणतात की तिच्यासमोर अब्ज,बंधु आणि बालसंतती पराजित होतात.

अब्ज अर्थात कमळ. ते आप म्हणजे पाण्यात जन्माला येत असल्याने त्याला अब्ज असे म्हणतात. बंधु म्हणजे बंधुजीव. या नावाचे एक अत्यंत आकर्षक लाल रंगाचे फुल असते.तर बालसंतती अर्थात नवजात अर्भक. त्या लहान मुलाच्या त्वचेच्या सौंदर्यपूर्ण लालिमेला, कोमलतेला मोरयाची शरीर कांती जणू पराजित करते म्हणून यांना म्हणतात शरीरकांतिनिर्जिताब्जबन्धुबालसंतती .

आचार्यश्री म्हणतात, मी सदैव अशा भगवान गणेशांना शरण जातो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

२४) श्री गणाधिपस्तोत्र- ३

शुकादिमौनिवन्दितं गकारवाच्यमक्षरं
प्रकाममिष्टदायिनं सकामनम्रपङ्क्तये ।
चकासनं चतुर्भुजैर्विकासिपद्मपूजितं ।
प्रकाशितात्मतत्वकं नमाम्यहं गणाधिपम् ।।

शुकादिमौनिवन्दित - शुकाचार्य इत्यादी ऋषिमुनींनी मौन पूर्वक वंदन केलेले. ही शब्दरचनाच मोठी गोड आहे.शुक शब्दाचा अर्थ पोपट असाही आहे. पोपट जसे ऐकतो तसे बोलतो. शुकाचार्य तसेच आहेत. भगवान वेदव्यासांनी जसे सांगितले तसे त्यांनी जगासमोर मांडले. अर्थात शास्त्रवचन, गुरुवचन मांडतात ते शुकाचार्य. वास्तविक शुक बोलण्यासाठीच प्रसिद्ध. त्यात शुकाचार्य. विवेचन, निरूपण करणे हेच त्यांचे काम. पण येथे ते मौन आहेत. कारण आता शब्दच असमर्थ ठरत आहेत. सगळी शास्त्रे हतबल होत आहेत. मन आणि वाणीच्या पार असणाऱ्या मोरया समोर त्यांची क्षमता संपली आहे. त्यामुळे ते मौन राहून केवळ वंदन करीत आहेत. असे सुंदर विवेचन आचार्यश्री करतात.

गकारवाच्य- ॐ कार जर उभा लिहिला तर त्याची वेलांटी ग् सारखीच दिसते. त्या ओंकाराच्या रूपातच ज्यांचे वर्णन केले जाते ते गकारवाच्य.

अक्षर- जे कधीच नाश पावत नाही असे.

या रूपात सुद्धा पुन्हा ओंकाराची समानता वर्णन केली आहे कारण ओंकारालाच एकाक्षर ब्रह्म असे म्हणतात.

प्रकाममिष्टदायिनं सकामनम्रपङ्क्तये - जे सकाम भावनेने भगवंतांना शरण येतात त्या सगळ्यांच्या समुदायाला भगवान त्यांच्या मनातील संपूर्ण इच्छित गोष्टी प्रदान करतात.

'चकासनं चतुर्भुजै:- जे चार हातानी शोभून दिसतात असे. धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे चारही पुरुषार्थ जावयाच्या हातात आहे ते सांगण्यासाठी त्यांना चार हात असतात.

विकासिपद्मपूजितं- फुललेल्या कमळांच्या द्वारे ज्यांचे पूजन केले जाते असे.

प्रकाशितात्मतत्वक- साधकांच्या आत्मतत्वाला प्रकाशित करणारे. त्यावर पडलेला मायेचा मळ दूर करणारे.

अशा भगवान गणाधिपांना मी वंदन करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

२५) श्री गणाधिपस्तोत्र ४

नराधिपत्वदायकं स्वरादिलोकदायकं!
जरादिरोगवारकं निराकृतासुरव्रजम् !
कराम्बुजैर्धरसृणीन् विकारशून्यमानसै-
र्हृदा सदा विभावितं मुदा नमामि विघ्नपम् !!४!!

नराधिपत्वदायक- भगवान श्री गणेश उपासकांना राजपद प्रदान करतात, हा झाला सामान्य अर्थ. खरेतर सर्वांचे अधिपती, सर्वांना परम वंदनीय, राजा देखील चरण वंदना करतो असे स्थान प्रदान करतात.

स्वरादिलोकदायक- ज्यांच्या आधी स्वर् असा शब्द आहे ते लोक म्हणजे स्वरादी लोक. सोप्या शब्दात स्वर्ग. अशा समस्त स्वर्गांना आणि देह असेपर्यंत या जगात स्वर्गीय सुख प्रदान करणारे.

जरादिरोगवारक- जरा म्हणजे म्हातारपण. त्याला सर्व रोगांच्या यादीत आरंभी स्थान दिले. म्हातारपण हाच सगळ्यात मोठा रोग. ते आले की बाकी रोग आपोआप येतात. अन्य रोग आले की जातात. पण म्हातारपण आले की जातच नाही. त्यामुळे तो सगळ्यात मोठा रोग.

निराकृतासुरव्रज- असुर म्हणजे राक्षस. त्यांचा व्रज म्हणजे समुदाय. त्यांचे निराकरण करणारे. त्यांचा संपूर्ण पराभव, विनाश करणारे.

कराम्बुजैर्धरसृणी- कर म्हणजे हात. अम्बुज अर्थात कमळ. एकत्रितरीत्या हस्तकमल. सृणी अर्थात टोकदार वस्तू. भगवान गणेशांच्या हातात असणारा अंकुश अत्यंत टोकदार असतो. करकमला मध्ये असा अंकुश धारण करणारे ते कराम्बुजैर्धरसृणी.

विकारशून्यमानसैर्हृदा सदा विभावित- विकार शून्य झालेल्या मनाचा द्वारे आनंदाने योगी लोक सदैव ज्यांचे ध्यान करीत असतात असे.

मुदा नमामि विघ्नपम् ! अशाच या विघ्नविनायकांना मी अत्यंत आनंदाने वंदन करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

२६) श्री गणाधिप स्तोत्र ५

श्रमापनोदनक्षमं समाहितान्तरात्मना !
समाधिभिः सदार्चितं क्षमानिधिं गणाधिपम् !
रमाधवादिपूजितं यमान्तकात्मसम्भवं !
शमादिषड्गुणप्रदं
नमामि तं विभूतये !!५!!

श्रमापनोदनक्षम - या जीवनात जीवाला त्रस्त करणार्या अनेकानेक गोष्टी उपलब्ध आहेत. प्रारब्धवशात या सगळ्यांशी संघर्ष करताना माणसाला येणाऱ्या श्रमाला ज्यांच्या उपासनेने शांती प्राप्त होते असे.

समाहितान्तरात्मना
समाधिभिः सदार्चित- योगसाधनेच्या माध्यमातून जितेन्द्रियत्व प्राप्त केलेल्या, बाह्य विश्वातून पराङ्मुख होऊन अंतरंगीच्या आनंदात स्थिरावलेल्या साधकांना 'समाहित आंतर आत्मा' असे म्हणतात. असे साधक समाधीमध्ये ज्यांचे अखंड अर्चन करतात ते 'समाहितान्तरात्मना
समाधिभिः सदार्चित.'

क्षमानिधि- भक्तांच्या द्वारे नकळत झालेल्या विविध अपराधांना क्षमा करण्याच्या बाबतीत भगवान अत्यंत सढळ आहेत.

गणाधिप- गणांचे अधिपती हा सामान्य अर्थ. पण गण कोणते? व्यष्टी पातळीवर शरीरातील समस्त अवयवांच्या देवता तर समष्टी पातळीवर ईश्वर महेश्वरादिकांना गण असे म्हणतात. त्या सगळ्यांचे जे संचालक ते गणाधिप.

ही केवळ गाणपत्य संप्रदायाची भूमिका नाही. आचार्यश्रींना देखील हे मान्य आहे, हे सांगणारी पुढील रचना आहे,

रमाधवादिपूजित- रमा म्हणजे देवी लक्ष्मी. तिचे धव म्हणजे पती, अर्थात भगवान विष्णू. श्री विष्णू इ. म्हणताना अन्य सर्व देवता अपेक्षित आहेत. त्यांनी पूजन केले असे ते रमाधवादिपूजित.

भगवान श्रीविष्णूंनी मधु आणि कैटभ नावाच्या दैत्यांच्या विनाशासाठी क्षमता प्राप्त व्हावी म्हणून श्रीक्षेत्र सिद्धटेक येथे भगवान श्री सिद्धिविनायकांच्या केलेल्या पूजनाचा येथे विशेष संदर्भ आहे.

यमान्तकात्मसम्भव- संपूर्ण विश्वातील जीवांचा अंत करणारे ते यमराज. त्यांचा अंत करतात ते भगवान शंकर. त्या श्री शंकरांचे आत्मतत्व पुत्र रुपात प्रगट होते त्यावेळी त्यांना म्हणतात,यमान्तकात्मसम्भव.

शमादिषड्गुणप्रद- शास्त्रामध्ये शम, दम, उपरती, तितिक्षा, श्रद्धा आणि समाधान या सहा गोष्टींना संपत्ती असे म्हणतात. या सहाही गोष्टी भगवान गणेशांच्या कृपेने साधकांना प्राप्त होतात.

आचार्यश्री शेवटी म्हणतात अशा श्रीगणेशांना मी विभूती अर्थात सकल संपदेकरिता वंदन करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

२७) श्री गणाधिपस्तोत्र ६

गणाधिपस्य पञ्चकं नृणामभीष्टदायकं !
प्रणामपूर्वकं जना: पठन्ति ये मुदायुता: !!
भवन्ति ते विदाम्पुर: प्रगीतवैभवा: जना:-
श्चिरायुषोऽधिकश्रिय: सुसूनवो न संशय: !! ६!!

या अंतिम श्लोकात भगवान जगद्गुरु आद्य शंकराचार्य स्वामी महाराज या स्तोत्राचा पठणाचे फळ सांगतांना म्हणतात, हे भगवान गणाधिपांचे स्तोत्र नरांना त्यांचे ईप्सित प्रदान करणारे आहे. अर्थात ज्याला ज्याला ,जे जे हवे ते ते सर्व या स्तोत्राने प्राप्त होते.

येथे लक्षात घ्यायला हवे ती सर्वच देवतांच्या सर्वच स्तोत्रांमध्ये असेच वर्णन असते. त्याचे कारण म्हणजे कोणत्याही एका देवतेचे, एकच स्तोत्र सर्वकाही प्रदान करण्यासाठी समर्थ असते. वेगवेगळ्या देवतांची खूप सारी स्तोत्रे म्हणत बसण्याऐवजी एकाच देवतेचे एकच स्तोत्र वारंवार पठण केल्याने अधिक लाभ होतो.

'प्रणामपूर्वकं जना: पठन्ति ये मुदायुता:' - हा उल्लेख देखील फार महत्वाचा आहे. स्तोत्राचे पठण प्रणाम पूर्वक व्हायला हवे. अर्थात ह्याच विनम्रता हवी. शरणागती हवी.

त्याच प्रमाणे हे पठण मुदायुता अर्थात आनंदी अंतकरणाने व्हायला हवे. भगवंताची उपासना भीतीने नव्हे तर प्रीतीने व्हायला हवी.

या पुढच्या ओळीत आचार्यश्रींनीं एक वेगळेच वैभव वर्णिले आहे. ते म्हणतात या स्तोत्राचे पठण करणारा विदाम्पुर: अर्थात विद्वानांच्या पुढ्यात, प्रगीत वैभव: अर्थात ज्याचे वैभव गायन केले जातो, असा होतो. व्यक्तीला वैभव प्राप्त होते. त्याच्या कीर्तीचे गायन होते. सगळ्यात महत्त्वाचे म्हणजे ते विद्वानांच्या समोर होते. ही आचार्य कथनी मोठी रमणीय आहे. सामान्य माणसाने केलेले कौतुकही आनंददायीच असते त्यातही ते साधुसंतांनी, पंडितांनी, विद्वानांनी केले तर त्याचा आनंद अपरंपार असतो. श्री गणेश उपासनेने साधकांना असा दिव्य आनंद प्राप्त होतो. असे आचार्य श्री सांगत आहेत.

याने दीर्घायुष्य प्राप्त होते. केवळ लांबलचक आयुष्य एवढाच अर्थ नव्हे तर श्रेष्ठ आयुष्य प्राप्त होते.

अत्यधिक वैभव, सुंदर पुत्र इ. व्यवहारातील सर्व आनंद प्राप्त होतात यात संशय नाही. असे म्हणत आचार्य श्री गणेश चरणी लीन होतात.

जय गजानन.